उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील गणेशवाडी या पुनर्वसित गावठाणामधील नागरी सुविधा कामांना निधी उपलब्ध करुन देणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: अर्थसं-२०२१/१८९/प्र.क्र.६९/र-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १३ जानेवारी, २०२२

वाचा -

१) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए २००८/प्र.क्र.५५०/र-१, दि.०१.०८.२००९
२) शासन परिपत्रक महसूल व वन विभाग क्र. आरपीए ०१११/प्र.क्र.१८/र-१, दि. २८.०३.२०११
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७/४/२०१५.
४) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं. २०१३/प्र.क्र.५७/र-८, दि. २३.०८.२०१३
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं. २०१३/प्र.क्र.५७/र-८, दि.१९.०८.२०१७
६) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.पुनर्व-२०१९/३४४/प्र.क्र. ८१/र-८, दि.१७.०६.२०२१
७) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं. २०१७/५५/प्र.क्र.१८/र-८, दि. २३.०३.२०१७
८) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्र.अर्थसं. २०१७/५५/प्र.क्र.१८/र-८, दि. १३.१०.२०१७
९) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३, दि. १४.१०.२०२१
१०) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचे क्रमांक: भीकामं/लेखा/३३५१/२०२१, दि. ३०.०६.२०२१ रोजीचे पत्र

**प्रस्तावना-**

उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील गणेशवाडी या पुनर्वसित गावठाणामधील नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ४ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानंतर सदर नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ५ व ६ येथील शासन निर्णयांन्वये सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच सदर नागरी सुविधा कामांना संदर्भाधीन क्र. ७ व ८ येथील शासन निर्णयांन्वये यापूर्वी निधी वितरित करण्यात आला आहे. सदर प्रगतीपथावरील/ पूर्ण झालेल्या नागरी सुविधा कामांना अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी संदर्भ क्र. १० अन्वये शासनास निधी मागणी प्रस्ताव सादर केला आहे.

२. त्यानुषंगाने, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील गणेशवाडी या पुनर्वसित गावठाणामधील नागरी सुविधा कामांना कामाच्या प्रगतीनुसार निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील गणेशवाडी या पुनर्वसित गावठाणामधील नागरी सुविधा कामासाठी एकूण रूपये १,९८,८२,०००/- एवढा निधी सन २०२१-२०२२ या चालू वित्तीय वर्षात वितरीत करण्यास खालील अटीच्या अधीन राहून शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. वित्त विभाग क्र. विअप्र.२०१३/ प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल २०१५ अनुसार वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग पहिला, उपविभाग तीन अनुक्रमांक ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अनुसार प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारांनुसार, उजनी प्रकल्पांतर्गत अहमदनगर जिल्ह्यातील कर्जत तालुक्यातील गणेशवाडी या पुनर्वसित गावठाणामधील खालील विवरणपत्रात नमूद पूर्ण झालेल्या/प्रगतीपथावरील नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी योजनेंतर्गत सन २०२१-२०२२ या वित्तीय वर्षात BEAMS प्रणालीवर उपलब्ध तरतूदीतून रूपये १,९८,८२,०००/- (रुपये एक कोटी अठ्ठ्याण्णव लक्ष ब्याऐंशी हजार फक्त) एवढा निधी "मागणी क्रमांक सी-१०, लेखाशीर्ष ४७०१- मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१-मोठे पाटबंधारे-वाणिज्यीक, ००१-संचालन व प्रशासन, (००) (०३) इतर प्रकल्प, ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) (कार्यक्रमावरील खर्च)" या लेखाशीर्षाखाली विभागीय आयुक्त, पुणे यांना उपलब्ध करुन देण्यात येत आहे-

| अ.क्र. | पुनर्वसित गाव | नागरी सुविधा कामांचा तपशील | वितरणासाठी प्रस्तावित रक्कम (रूपये) |
|---|---|---|---|
| १ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.१) | ६१,४०,०००/- |
| २ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.२) | २५,२८,०००/- |
| ३ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.३) | ४०,६०,०००/- |
| ४ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.४) | ३६,८९,०००/- |
| ५ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.५) | २१,८३,०००/- |
| ६ | गणेशवाडी | खेड-भिगवण राज्य रस्ता ते पुनर्वसित गावठाण गणेशवाडी पोहोच रस्त्याचे डांबरीकरण करणे व त्यावरील मोरी बांधकाम करणे (कि.मी.६) | १२,८२,०००/- |
| | | **एकूण -** | **१,९८,८२,०००/-** |

**३. वित्तीय शिस्तीच्या अनुषंगाने सर्व संबंधितांनी खालील सूचनांची/अटींची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.**

१) विभागीय आयुक्त, पुणे यांनी त्यांना या आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित नियंत्रण अधिकारी म्हणून संबंधित अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांचेकडे अर्थसंकल्प वितरणप्रणाली BEAMS द्वारे तात्काळ वितरित करावा.

२) अधीक्षक अभियंता, भीमा कालवा मंडळ, सोलापूर यांनी नागरी सुविधा कामांसाठी वितरीत सदरचा निधी विभागीय आयुक्त, पुणे यांचेकडून प्राप्त होताच संबंधित कार्यकारी अभियंता यांचेकडे विनाविलंब वितरीत करावा.

३) नागरी सुविधा कामांसाठी शासनाच्या पुनर्वसन विभागाकडून निधी उपलब्ध करुन दिला जात असल्याने नागरी सुविधा कामांची देयके अदा करण्यासाठी संबंधित पाटबंधारे विकास महामंडळाकडून कोणतीही परवानगी/मंजुरी घेण्याची आवश्यकता नाही.

४) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर यांनी या आदेशान्वये मंजूर केलेला निधी प्राप्त होताच नागरी सुविधा कामांची प्रलंबित देयके तात्काळ अदा करावीत, तद्नुषंगाने कार्यपूर्ती अहवाल शासन, विभागीय आयुक्त, पुणे तसेच संबंधित जिल्हाधिकारी यांना सत्वर सादर करावा.

५) या आदेशान्वये ज्या नागरी सुविधा कामांना उपलब्ध करुन देण्यात आला आहे त्याच नागरी सुविधा कामांवरच खर्च करण्यात यावा. तसेच सदर निधी खर्च करताना मंजूर केलेल्या अनुदानापेक्षा कोणत्याही परिस्थितीत जास्त खर्च होणार नाही याची अधीक्षक अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

६) मंजूर निधी शासनाच्या पूर्वमान्यतेशिवाय अन्य कामांवर खर्च होणार नाही याची संबंधित प्रकल्प अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

७) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र. सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१-मोठे पाटबंधारे- वाणिज्यिक, ००१-संचालन व प्रशासन, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत कोणताही निधी शिल्लक रहाणार नाही अथवा सदर आदेशान्वये प्राप्त होणारा निधी संबंधित यंत्रणेच्या कोणत्याही Operational Bank Account /PLA (स्वीय प्रपंची खाते) मध्ये जमा करून ठेवण्यात येणार नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

८) सदरच्या आदेशातील नमूद मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१-मोठे पाटबंधारे- वाणिज्यीक, ००१-संचालन व प्रशासन, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे कोणतेही संक्षिप्त देयक प्रलंबित नाही, याची संबंधित यंत्रणेचे अधीक्षक अभियंता व कार्यकारी अभियंता यांनी दक्षता घ्यावी.

९) मुख्यलेखाशीर्ष मागणी क्र.सी-१०, ४७०१, मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्पावरील भांडवली खर्च, ०१-मोठे पाटबंधारे- वाणिज्यीक, ००१-संचालन व प्रशासन, (००) (०३) इतर प्रकल्प (कार्यक्रम), ५३ मोठी बांधकामे (४७०१-एच-७२७) (दत्तमत) या लेखाशीर्षांतर्गत संबंधित संनियत्रण अधिकारी यांनी होणाऱ्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवून शासनाच्या प्रचलित लेखा पध्दतीनुसार ते महालेखापाल यांना सादर करावेत. तद्नुषंगाने या लेखाशीर्षाखाली होणाऱ्या खर्चाचा ताळमेळ, विनियोजन लेखे इत्यादि कामे संबंधितांनी प्रचलित पध्दतीप्रमाणे करावीत.

१०) यासंदर्भातील खर्च विवरणपत्रे/ अहवाल शासनास न चुकता सादर करण्यात यावीत. वरील निधी संबंधित खर्च ताळमेळाची विवरणपत्रे महालेखापाल कार्यालयाच्या Reconcillation Slip सह शासनास न चुकता सादर करावीत.

११) संबंधित अधीक्षक अभियंता यांनी या आदेशान्वये वितरीत निधीचे उपयोजन प्रमाणपत्र Utilisation Certificate महालेखापाल कार्यालय, संबंधित जिल्हाधिकारी/ विभागीय आयुक्त/शासनास तातडीने सादर करावे.

१२) यासंदर्भातील लेखाशीर्षाखाली चालू वित्तीय वर्ष सन २०२१-२०२२ मध्ये मंजूर करण्यात आलेल्या निधीच्या अनुषंगाने खर्चाचा विनियोजन लेखा संबधितांनी विहित कालावधीत शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०११३१५१६३७५४१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SANJAY MAROTI JAGTAP

Digitally signed by SANJAY MAROTI JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9ea94b7d58fc204d63a497943e6c56976c537462d5f2964980c30906051d44d7, pseudonym=CB263AE7A97BA5DB04805052B34A6E185702D5F9, serialNumber=2C1FC771D686D36A26A8AF97940982698437 8A73F9D4AEECA990209686CC25BD, cn=SANJAY MAROTI JAGTAP
Date: 2022.01.13 15:16:51 +05'30'

**(संजय जगताप)**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) विभागीय आयुक्त तथा मुख्य नियंत्रण अधिकारी (पुनर्वसन) पुणे विभाग, पुणे.
२) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, सोलापूर.
३) जिल्हाधिकारी तथा पुनर्वसन उपसंचालक, अहमदनगर.
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, अहमदनगर.
५) उप आयुक्त (पुनर्वसन), पुणे.
६) अधीक्षक अभियंता (बांधकाम), भीमा कालवा मंडळ, सोलापूर.
७) कार्यकारी अभियंता, उजनी कालवा विभाग क्र. ८, सोलापूर
८) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
९) महालेखापाल (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य,मुंबई-१,नागपूर-२ (२ प्रतीत)
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/अहमदनगर.
११) जलसंपदा विभाग, कार्यासन मोप्र-२, मंत्रालय, मुंबई.
१२) वित्त विभाग,कार्यासन व्यय-१०, अर्थसंकल्प-३, मंत्रालय, मुंबई.
१३) नियोजन विभाग,कार्यासन १४७५,मंत्रालय, मुंबई.
१४) महसूल व वन विभाग, कक्ष अधिकारी ब-१, मंत्रालय, मुंबई.
१५) महसूल व वन विभाग, पी.ए.सी.कार्यासन, मंत्रालय, मुंबई.
१६) निवडनस्ती कार्यासन र-८,महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई.